एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत पोषण अभियानाची राज्यात अंमलबजावणी करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१८/प्र.क्र.३५३/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १० फेब्रुवारी, २०२०

वाचा : - (१) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय, क्र.एबावि-२०१८/प्र.क्र.२७/का.६, दिनांक ११ जुलै २०१८
(२) महिला व बाल विकास विभाग,शासन पत्र क्र.एबावि-२०१८/प्र.क्र.३५३/का.६, दिनांक ६ मे, २०१९
(३) महिला व बाल विकास विभाग,शासन पत्र क्र.एबावि-२०१८/प्र.क्र.३५३/का.६, दिनांक २० मे, २०१९
(४) केंद्र शासनाचे पत्र क्र.NNM/६०/२०१८-CPMU (५३०७२), दि.१७/०६/२०१९
(५) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय, क्र.एबावि-२०१८/प्र.क्र.३५३/का.६, दिनांक ३० ऑगस्ट, २०१९
(६) आयुक्त तथा राज्य प्रकल्प संचालक, राज्य पोषण संसाधन कक्ष, पोषण अभियान, नवी मुंबई यांचे पत्र जा.क्र.एबाविसेयो/का-४/पोषण अभियान/२०१९/५९९६, दि.२१/११/२०१९
(७) आयुक्त तथा राज्य प्रकल्प संचालक, राज्य पोषण संसाधन कक्ष, पोषण अभियान, नवी मुंबई यांचे पत्र जा.क्र.एबाविसेयो/का-४/पोषण अभियान/२०१९/६३६९, दि.१३/१२/२०१९
(८) आयुक्त तथा राज्य प्रकल्प संचालक, राज्य पोषण संसाधन कक्ष, पोषण अभियान, नवी मुंबई यांचे पत्र जा.क्र.एबाविसेयो/का-४/पोषण अभियान/२०२०/२१९, दि.१८/०१/२०२०

**शासन निर्णय:-**

पोषण अभियान हा समग्र पोषणावर आधारीत महत्त्वपुर्ण कार्यक्रम एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत राबविण्यात येत आहे. सदर कार्यक्रमामध्ये केंद्र व राज्य हिस्सा प्रमाण ८०:२० आहे. पोषण अभियानांतर्गत सन २०२०-२१ मधील विविध उपक्रमांसाठी केंद्र शासनाच्या निर्देशानुसार आगाऊ रक्कम वितरीत करणे आवश्यक असल्याने व त्यासाठी केंद्र शासनाकडून आवश्यक निधी उपलब्ध झालेला असून तो या वित्तीय वर्षात खर्च करणेकरिता क्षेत्रिय स्तरावर खालील कारणांसाठी निधी उपलब्ध करुन देणे आवश्यक असल्याबाबत आयुक्त तथा राज्य प्रकल्प संचालक, राज्य पोषण संसाधन कक्ष, पोषण अभियान, नवी मुंबई यांनी कळविले आहे.

(१) पोषण अभियानांतर्गत CBE कार्यक्रमाचे अंगणवाडी स्तरावर दरमहा २ कार्यक्रम आयोजन करणेकरिता पुढील आर्थिक वर्षात (सन २०२०-२१) सर्व अंगणवाडी केंद्रांना CBE कार्यक्रमासाठी प्रति अंगणवाडी प्रति माह रु.५००/- याप्रमाणे आगाऊ अनुदान उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात यावी.
(२) पोषण अभियांनातर्गत सर्व अंगणवाडी सेविका, मुख्यसेविका व तांत्रिक मनुष्यबळ यांना मोबाईल फोन उपलब्ध करुन देण्यात आलेले आहेत. सदर मोबाईल फोन डाटा रिचार्ज करण्याकरिता पुढील आर्थिक वर्षाकरीता (सन २०२०-२१) सर्व अंगणवाडी सेविका / मुख्यसेविका व तांत्रिक मनुष्यबळ यांना आगाऊ अनुदान उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात यावी.

२. वरीलप्रमाणे सन २०२०-२१ करीता आगाऊ अनुदान द्यावयाचे असल्याने त्याअनुषंगाने सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता पोषण अभियानाची अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने केंद्र हिश्श्याचा (८०%) रु.१३७.४९ कोटी व राज्य हिश्श्याचा (२०%) रु.३४.३७ कोटी असे एकूण रु.१७१.८६ कोटी एवढया रक्कमेचा

पुरवणी मागणीचा प्रस्ताव माहे डिसेंबर, २०१९ च्या अधिवेशनामध्ये मंजूर झाला आहे. त्याअनुषंगाने निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केला असता नियोजन व वित्त विभागाने पुरवणी मागणीचा निधी वितरीत करण्यास परवानगी दिली आहे.

३. सबब पोषण अभियानाकरिता CBE कार्यक्रमाचे आयोजन करणेकरिता व अंगणवाडी सेविका, पर्यवेक्षिका, तांत्रिक मनुष्यबळ यांना मोबाईल फोन डाटा रिचार्ज करणेकरीता पुढील वर्षाकरीताचे आगाऊ अनुदान मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. त्याअनुषंगाने पोषण अभियानाअंतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध बाबीं करीता खालीलप्रमाणे तक्त्यातील रकाना क्र.८ नुसार निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| लेखाशिर्ष | बाब | अर्थसंकल्पिय अंदाज | माहे जुलै,१९ मधील मंजूर पुरवणी मागणी | माहे डिसें.१९ मधील मंजूर पुरवणी मागणी | एकूण मंजूर निधी (३ + ४ + ५) | यापूर्वी वितरीत केलेला निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| .१. | .२. | .३. | .४. | .५. | .६. | .७. | .८. |
| २२३६२०८४ (केंद्र) ८०% | १०-कंत्राटी सेवा | १२७३.२४ | ४२०.६८ | २४५९.९५ | ४१५३.८७ | १६००.०० | २४५९.९५ |
| | १३-कार्यालयीन खर्च | ६५.९२ | १४.०८ | ० | ८०.०० | ८०.०० | ० |
| | १७-संगणक खर्च | ३४.५६ | निरंक | ३२०.०० | ३५४.५६ | ३४.५६ | ३२०.०० |
| | ५०-इतर खर्च | ४०००.०० | १०७८१.३२ | १०९६८.८५ | २५७५०.१७ | १०४६७.४४ | १०९६८.८५ |
| | **एकूण (अ)** | **५३७३.७२** | **११२१६.०८** | **१३७४८.८०** | **३०३३८.६०** | **१२१८२.००** | **१३७४८.८०** |
| २ २३६२०९३ (राज्य) २०% | १०-कंत्राटी सेवा | ३१८.३१ | १०५.१७ | ६१४.९९ | १०३८.४७ | ४००.०० | ६१४.९९ |
| | १३-कार्यालयीन खर्च | १६.४८ | ३.५२ | ० | २०.०० | २०.०० | ० |
| | १७-संगणक खर्च | ८.६४ | निरंक | ८०.०० | ८८.६४ | ८.६४ | ८०.०० |
| | ५०-इतर खर्च | १०००.०० | २६९५.३३ | २७४२.२१ | ६४३७.५४ | २६१६.८६ | २७४२.२१ |
| | **एकूण (ब)** | **१३४३.४३** | **२८०४.०२** | **३४३७.२०** | **७५८४.६५** | **३०४५.५०** | **३४३७.२०** |
| **एकूण (अ) + (ब)** | | **६७१७.१५** | **१४०२०.१** | **१७१८६.००** | **३७९२३.२५** | **१५२२७.५०** | **१७१८६.००** |

४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी वित्त विभागाच्या दिनांक ८/०७/२०१९ च्या परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या तपासणी सूचीतील बाबींची, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांची तसेच यासंदर्भात नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.

हा शासन निर्णय नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.०६/१४७२, दिनांक १५/०१/२०२० व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१२/व्यय-६, दिनांक ३०/०१/२०२० अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१३११८२३५६३६३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2020.02.14 14:43:54 +05'30'

**(ला. रा. गुजर)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.

६) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
७) सर्व जिल्हाधिकारी
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
९) सर्व महिला व बाल विकास अधिकारी (जिल्हा परिषद)
१०) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प
११) वित्त विभाग (व्यय/६ ,अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१२) नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय,मुंबई.
१३) अवर सचिव (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
त्यांना कळविण्यात येते की, त्यांनी BDS प्रणालीवर निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत करावा.
१४) निवड नस्ती -का-६.